महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत
प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या पाणी
पुरवठा व मलनि:स्सारण योजनांना
अनुदान वितरीत करण्याबाबत.
नगर परिषद गेवराई, जि. बीड

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः सुनिअ २०१४/प्र.क्र. ४०३/पापु.२२

गो.ते. हॉस्पिटल संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: १० नोव्हेंबर, २०१५

**वाचा :**

१. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक- सुनिअ २००८/प्र.क्र.१/पापु२२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक- सुनिअ २००८/प्र.क्र.१९८/पापु२२, दिनांक २३ डिसेंबर, २००८
३. शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र- सुनिअ २०१९/प्र.क्र.२१९/पापु.२२ दि २५.८.२००९
४. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र. मजीप्रामंऔ/चित्रशाखा / १३७६/१०, दि.५.६.२०१०
५. मुख्याधिकारी, गेवराई नगर परिषद यांचे कार्यादेश क्र.जी.एम.सी.डब्ल्यू.एस.११९/११, दि.१४.१.२०११
६. शासन पत्र क्रमांक-सुनिअ-२०१०/प्र.क्र.२७८/पापु-२२, दि. १५.७.२०१०
७. शासन निर्णय पा.पु. व स्व.विभाग, क्र- सुनिअ २०१२/अनुदान/ प्र.क्र.६८०/पापु.२२ दि १९.१२.२०१२
८. मुख्याधिकारी, गेवराई नगर परिषद, जि. बीड यांचे पत्र क्र. जी.एम.सी.डब्ल्यू.एस. १७२४/१५, दि.२९.६.२०१५ आणि क्र. जी.एम.सी.डब्ल्यू.एस. २३६८/ १५, दि.३.११.२०१५

**प्रस्तावना :**

दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे हा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दिनांक २५.८.२००९ अन्वये गेवराई शहर पाणी पुरवठा योजनेच्या रु.१,११,००,०००/- इतक्या सुधारणा कामास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्याप्रमाणे गेवराई नगर परिषदेने स्वहिश्श्यापोटी रु.११.०० लक्ष रक्कम बँकेमध्ये जमा केली आहे. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, औरंगाबाद यांनी संदर्भ क्र. ४ अन्वये गेवराई शहर पाणी पुरवठा योजनेच्या सुधारणा कामांच्या रु. ११०.४० लक्ष इतक्या ढोबळ किंमतीस तांत्रिक मान्यता दिली आहे. मुख्याधिकारी, गेवराई नगर परिषद यांच्या संदर्भ क्र. ५ च्या

कार्यादेशाप्रमाणे, सदर योजनेच्या अंदाजपत्रकीय रक्कमेप्रमाणे रु.९८,१७,६६१/- ची निविदा मंजूर करण्यात आली आहे. शासन निर्णय, दिनांक २५.८.२००९ प्रमाणे सदर मंजूर निविदा रकमेवर ५% इटीपी चार्जेस (रु.४,९०,८८३/-) लावून योजनेची एकूण सुधारीत किंमत रु.१,०३,०८,५४४/- इतकी येत आहे. गेवराई नगर परिषदेने यापुर्वी स्वहिश्श्यापोटी बँकेमध्ये जमा केलेल्या रक्कमेच्या प्रमाणात अनुज्ञेय अनुदानापैकी शासन पत्र, दि.१५.७.२०१० अन्वये रुपये ३३.३० लक्ष, शासन निर्णय, दि.१९.१२.२०१२ अन्वये रु.३६.०० लक्ष असे एकुण रु. ६९.३० लक्ष इतके अनुदान गेवराई नगर परिषदेस वितरीत करण्यात आले आहे. मुख्याधिकारी, गेवराई नगर परिषद यांनी एकूण रुपये रु.७९.५८ लक्ष रुपयाचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले असून मंजूर सुधारणा कामे १००% पूर्ण झाली असल्याचे कळविले आहे. तसेच कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, औरंगाबाद यांनी गेवराई पाणीपुरवठा योजनेच्या सुधारणा कामांचे COMPLETION CERTIFICATE सादर केले आहे. सदर बाबी विचारात घेता, शासन निर्णय दि. २५.८.२००९ अन्वये मंजूर गेवराई शहर पाणी पुरवठा योजनेच्या सुधारणा कामांकरीता अनुज्ञेय अनुदानापैकी उर्वरित अनुदान रु. २३,४७,६९०/- इतके अनुदान गेवराई नगर परिषदेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दि. २५.८.२००९ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या गेवराई शहर पाणी पुरवठा योजनेच्या सुधारणा कामांकरीता अनुज्ञेय अनुदानापैकी उर्वरित अनुदान रुपये २३,४७,६९०/- (रुपये तेवीस लाख सत्तेचाळीस हजार सहाशे नव्वद फक्त) इतके अनुदान पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम रुपयांत)

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेने निकषानुसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | यापुर्वी वितरीत करण्यात आलेले अनुदान | राज्य शासना-कडून याद्वारे वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| गेवराई | १,०३,०८,५४४ | ९२,७७,६९० | १०,३०,८५४ | ११,००,००० | ६९,३०,००० | **२३,४७,६९०** |
| | | | | | **एकुण रुपये** | **२३,४७,६९०** |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगर पालिका इत्यादींना सहाय्य - राज्य योजना - (०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहायक अनुदान (२२१५ १६४७), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर लेखाशिर्षाखाली शासनाकडून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमूद स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगीता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावी.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधीत नागरी संस्थानी शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक- नापापु २००८/प्र.क्र.१/पापु-२२ दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०९१३०१२९६८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prabhakar L Chakre

Digitally signed by Prabhakar L Chakre
DN: CN = Prabhakar L Chakre, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.11.10 13:00:42 +05'30'

**(प्र.ल.चक्रे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

- मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
- प्रधान सचिव पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
- सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
- महालेखापाल १ -मुंबई/नागपूर.
- संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.
- विभागीय आयुक्त, महसुल विभाग, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
- जिल्हाधिकारी, बीड
- मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना, ठाणे.
- संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- अध्यक्ष/मुख्याधिकारी, नगरपरिषद, गेवराई, जि. बीड
- जिल्हा कोषागार अधिकारी, बीड
- जिल्हा प्रकल्प अधिकारी, (नगरपालिका) जिल्हाधिकारी कार्यालय, बीड
- वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- कक्ष अधिकारी, पापु.०४,पापु.२०,पापु.२४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- निवडनस्ती, पापु-२२